**राज्यातील जिल्हा परिषदेतील वाहनचालक पदाची शैक्षणिक आर्हता, परिक्षेचा दर्जा तसेच गुणदान ठरविण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

शासन निर्णय क्र.एपिटी-२०११/प्र.क्र. ३१० /आस्था-८
ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ९ सप्टेंबर, २०११.

संदर्भ : शा.प.क्र.एपिटी-२००७/प्र.क्र.३०३(अ)/आस्था-८/, दि.१९.०३.२००८.

**प्रस्तावना :**

या विभागाच्या दिनांक १९ मार्च,२००८ च्या परिपत्रकान्वये जिल्हा परिषदांमध्ये भरण्यात येणाऱ्या वर्ग-३ व वर्ग-४ च्या पदांसाठी प्रश्नपत्रिकेचा दर्जा व प्रश्नपत्रिकेचे स्वरुप निश्चित करण्यात आलेले आहे. सदर परिपत्रकामध्ये वाहन चालकाचे पदासाठी प्रश्नपत्रिकेचा दर्जा व स्वरुप निश्चित करण्यात आले नव्हते. या पदांसाठी प्रश्नपत्रिकेचा दर्जा व स्वरुप निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती तसेच महाराष्ट्र जिल्हा परिषद जिल्हा सेवा (सेवाप्रवेश ) नियम १९६७ मध्ये वाहन चालक पदांची शैक्षणिक अर्हता ४ थी पास आहे त्यातही बदल करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र जिल्हा परिषद जिल्हा सेवा (सेवाप्रवेश ) नियम १९६७ मध्ये वाहन चालक पदाची शैक्षणिक अर्हता ४ थी पास आहे त्याऐवजी शैक्षणीक अर्हता १२ वी पास अशी धरण्यात यावी. याबाबत सेवा प्रवेश नियमात यथावकाश सुधारणा करण्यात येईल.

तसेच राज्यातील सर्व जिल्हा परिषदांतील वाहन चालक पदाच्या भरतीकरीता घेण्यात येणाऱ्या लेखी परिक्षेकरीता खालीलप्रमाणे परिक्षेचा दर्जा निश्चित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | संवर्ग | प्रश्न पत्रिकेचा दर्जा |
|---|---|---|
| १ | वाहन चालक | इयत्ता १२ वी |

कृ.मा.प.

तसेच वाहन चालक पदाच्या लेखी परीक्षेसंदर्भात प्रश्नपत्रिकेचे स्वरुप पुढीलप्रमाणे विहित करण्यात येत आहे :-

| अ. क्र. | सवर्ग | मराठी संबंधित प्रश्न | | सामान्य ज्ञान संबंधित प्रश्न | | गणिताशी संबंधित प्रश्न | | एकूण | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | प्रश्न | गुण | प्रश्न | गुण | प्रश्न | गुण | प्रश्न | गुण |
| १ | वाहन चालक | ३० | ३० | ५० | ५० | २० | २० | १०० | १०० |

सदर पदासाठी वरिलप्रमाणे लेखी परिक्षा १०० गुणांची व गाडी चालविण्याची चाचणी घेण्यात यावी.

सदर शासन निर्णय संगणक संकेतांक क्रमांक २०११०९०८१६१५३९००१ अन्वये www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( विजय नि. भोसले )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) विभागीय आयुक्त, सर्व विभाग.
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
३) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, कार्यासन आस्था ९ व आस्था १०
४) निवड नस्ती / आस्था-८, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.